**मुंबई शहर व उपनगरे क्षेत्रात विशेषत्वाने झोपडपटटी भागात नागरी गरीबांना मुलभूत व पायाभूत सोयी सुविधा पुरविण्यासाठी सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षामध्ये म्हाडा प्राधिकरणास सहाय्यक अनुदान मंजूर करण्याबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०१४/प्र.क्र.६७/झोपनि-२**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई
तारीख: ३१ मार्च,२०१५

**वाचा - १.शासन समक्रमांकाचा दि.८ ऑगस्ट,२०१४ चा शासन निर्णय.**
**२. शासन समक्रमांकाचा दि.२२ ऑगस्ट, २०१४ चा शासन निर्णय.**
**३. शासन समक्रमांकाचा दि.२८ ऑगस्ट, २०१४ चा शासन निर्णय**
**४. मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ यांचे दि.२७.३.२०१५ चे पत्र.**

**शासन निर्णय -**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये, मुंबई शहर व उपनगर जिल्हयातील विशेषत्वाने झोपडपटटी भागात नागरी गरीबांना मुलभूत व पायाभूत सोयी सुविधा उपलब्ध करुन देण्याकरिता सन २०१४-१५ या वित्तीय वर्षामध्ये रू.१२६ कोटी इतका निधी म्हाड अधिनियम,१९७६ च्या कलम २८ (१) (a) (ii) व कलम २८ (१) (a) (iii) मध्ये नमूद केलेल्या प्रयोजनार्थ ( १ ) मुंबई झोपडपटटी सुधार मंडळ ( २ ) मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ व (३) मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ अशा म्हाडा प्राधिकरणास योग्य वाटतील अशा मुंबई येथे कार्यरत घटक मंडळाच्या माध्यमातून मुंबई शहर व उपनगर जिल्हयात विशेषत्वाने झोपडपट्टी भागातील नागरी सुविधांची लोकोपयोगी मुलभूत व पायाभूत सोयी सुविधांची कामे करुन घेण्याच्या प्रयोजनार्थ त्यातील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात आली आहे.

२. उपरोक्त आदेशाच्या अनुषंगाने यापूर्वी म्हाडाकडून ३० मतदारसंघातील कामांच्या यादीसह प्रशासीय मान्यतेचे आदेश शासनास प्राप्त झाल्यावर रु. ६० कोटी प्रत्यक्ष वितरणाचे आदेश संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये व रू २१ कोटी प्रत्यक्ष वितरणाचे आदेश संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. एकूण रू.१२६ कोटी मधून शिल्लक असलेला रू.४५ कोटी निधी म्हाडाकडे सुपूर्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय -**

३. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या रू.१२६ कोटी इतक्या निधीमधून,शिल्लक असलेला रु.४५ कोटी इतका निधी बृहन्मुंबईतील ३६ विधानसभा मतदार संघातील विधानसभा सदस्यांनी सुचविलेल्या झोपडपट्टी भागातील नागरी गरीबांना मुलभूत व पायाभूत सोयी सुविधा पुरविण्याच्या कामांपैकी ज्या कामांना म्हाडाने प्रशासकीय मान्यता दिली आहे अशी कामे करण्यासाठी,

समप्रमाणात निधी वितरीत करण्याच्या अटीस अधीन राहून, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांच्याकडे सुपूर्द करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. मुंबई उपनगर जिल्हयातील वांद्रे विधानसभा मतदार संघात विधानसभा पोटनिवडणूकीची आचारसंहिता चालू असल्याने सदर मतदारसंघ वगळता उर्वरित ३५ मतदारसंघांना प्रत्येकी रु. १.२५ कोटी या प्रमाणे एकूण रू.४३.७५ कोटी निधी वरील प्रयोजनार्थ वितरीत करण्यास शासनाची मंजूरी आहे. वांद्रे मतदारसंघाची पोटनिवडणूकीची आचारसंहिता संपुष्टात आल्यानंतर त्या मतदारसंघातील वरील कामे ( उर्वरित रु. १.२५ कोटी या मर्यादेत) म्हाडाची प्रशासकीय मान्यता घेऊन शासनाकडे मंजूरीस्तव सादर करण्यात यावीत.

४. प्रस्तूत निधी अंतर्गत होणारा खर्च हा मुंबई शहर व उपनगरे क्षेत्रात विशेषत्वाने झोपडपटटी भागात नागरी गरीबांना मुलभूत व पायाभूत सोयी सुविधा पुरविण्यासाठी सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षामध्ये म्हाडा प्राधिकरण यांना सहाय्यक अनुदान देणे या प्रित्यर्थ होणारा खर्च " २२१६-गृहनिर्माण, ८०-सर्वसाधारण, १०३,गृहनिर्माण मंडळे, महामंडळे इत्यादींना सहाय्य-पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना (०१) (०४) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास सहाय्यक अनुदाने (२२१६ ०८९५) ३१ सहाय्यक अनुदाने, गृहनिर्माण योजना (पायाभूत सुविधा )" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन तो सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४४४/व्यय-३, दि.८.८.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०११३२४२९४६०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajaram G Salvi

Digitally signed by Rajaram G Salvi
DN: CN = Rajaram G Salvi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.01 13:34:36 +05'30'

**रा.ग.साळवी**
उप सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
२. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
३. निवासी लेखा अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१.

४. महालेखापाल ( लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई ४०० ०२०.
५. महालेखापाल ( लेखापरीक्षा व लेखाअनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२, नागपूर
६. मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधारमंडळ,गृहनिर्माण भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई
७. सह सचिव,गृहनिर्माण विभाग, यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. सह सचिव, नियोजन विभाग, कार्या-१४७२, मंत्रालय, मुंबई-३२.
९. उप सचिव ,वित्त विभाग, अर्थोपाय/व्यय-३/अर्थ-१७ कार्यासन, मंत्रालय, मुंबई
१०. उप सचिव, गृहनिर्माण विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई-३२.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२. अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
१३. आहरण व संवितरण अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४. कक्ष अधिकारी (अर्थसं-१) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५. निवडनस्ती, कार्यासन झोपनि-२.